राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम योजनेसाठी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये डिसेंबर, २०२१ हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी वितरण करणेबाबत.
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२१५A०९७)

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२०/प्र.क्र.०९/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०९ फेब्रुवारी, २०२२

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ दि.१४.१०.२०२१ व दि.२८.१.२०२२
२) शासन निर्णय समक्रमांक दि.२३.८.२०२१
३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची नस्ती क्र.जजमि २०२०/प्र.क्र.१९१/पापु-१०

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (०२) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (राज्य हिस्सा ५०टक्के) (कार्यक्रम) (२२१५ए०९७) या लेखाशिर्षाखाली रु.९७६३.८८ लाख इतका नियतव्यय मंजूर आहे. त्यापैकी संदर्भाधीन दि.२३.८.२०२१ च्या शासन निर्णयान्वये राज्य हिस्सा रु.४३९३.७४६ लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच या लेखाशिर्षामध्ये डिसेंबर, २०२१ हिवाळी अधिवेशनामध्ये रु.३१२.९६९३ कोटी इतका निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१ व दि.२८.१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली असून कार्यक्रमांतर्गत योजनांच्या ६० टक्के मर्यादेत खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम योजनेसाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार तसेच पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने वाचा क्र.३ येथील नस्तीवर प्रस्तावित केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता डिसेंबर, २०२१ हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु.३१२.९६९३ कोटी इतक्या निधीपैकी राज्य हिस्सा ५०टक्के २२१५ए०९७ या लेखाशिर्षाखाली ३१-सहायअ अनुदाने वेतनेत्तर मध्ये रु.२९६.०६९३६ कोटी इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले

भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१ व दि.२८.१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१ व दि.२८.१.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४२/व्यय-१४, दि.२.२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०९१६३८३३२६२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.02.09 16:39:42 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई
५) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
६) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
७) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
८) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (पापु-१०), मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग